सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षातील प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी २२१० जी ४९४ (TSP) या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्स्यापोटी (४०%) निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः पुरक-२०२२/प्र.क्र.२८१/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
तारीख: २७ मार्च, २०२३.

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४.०४. २०२२.

३) राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र क्रमांक: राआहसो/लेखा/प्रअ/१०१३९/२६५/२०२३, दिनांक १३.०२.२०२३ .

४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२२/प्र.क्र.५/कार्यासन-६ दिनांक २५.०३.२०२३.

प्रस्तावना -

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०% व राज्य शासनाचा ४०% आर्थिक सहभाग आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सदर योजनेसाठी २२१० जी ४९४ (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित रु.१५.०० कोटी व पुरवणी मागणीद्वारे ९,२६,७६,०००/- असा एकूण रु. २४,२६,७६,०००/-इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचा माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या त्रैमासिक कालावधीतील कमी प्राप्त रक्कम व माहे एप्रिल, २०२३ ते माहे जून, २०२३ या त्रैमासिक कालावधीतील विमा हप्ता अदा करण्यासाठी राज्य हिस्स्यापोटी Escrow Account मध्ये वर्ग करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचेमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचा प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या त्रैमासिक कालावधीतील कमी प्राप्त रक्कम व माहे एप्रिल, २०२३ ते माहे जून, २०२३ या त्रैमासिक कालावधीतील विमा हप्ता रक्कम रु.९,२६,७६,०००/- एवढा सशर्त ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाकरीता निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) शासनाने विहीत केलेल्या विमा दराने सदरचा निधी हा एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमाहप्त्यापोटी विमा कंपनीस व हमी तत्वावरील दाव्यांच्या प्रदानासाठी संबंधीत रूग्णालयास प्रदान करण्यात यावा.

२) सदरचा निधी विमा कंपनीस विमाहप्ता अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमून्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

३. सदर निधी आयुष्यमान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना, महाराष्ट्र या खात्यामध्ये जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापुर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यामध्ये (ESCROW Account) जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

६. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात खालील दिलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या तरतुदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

**मागणी क्र. टी-५**

२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,

०३-ग्रामीण आरोग्य सेवा- विषम चिकीत्सा,

७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना,

(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना,

(०१) (०७)-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४० टक्के)

२२१० जी ४९४, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

७. आदिवासी उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या दिनांक २५ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

८. सदर शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाच्या दिनांक २५ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. २२९/व्यय-१४, दिनांक १३.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२४१३३७१३४११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2023.03.27 18:15:53 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३ प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.